**गृह विभागाच्या ई-गव्हर्नन्स प्रकल्पासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: - गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २०.०५.२०१५.

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग, क्र.मातंस-२०११/प्र.क्र.१२५/३९, दि.२३.९.२०११.

२) **शासन निर्णय क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग, क्र.१२५६/फाईल/डीआयटी/२०१२, दि.२१.०९.२०१२.

**प्रस्तावना :**

माहिती तंत्रज्ञानाचा उपयोग करून नागरिकांना माफक दरात, जलद व पारदर्शकरित्या ई-सेवा पुरविण्याच्या हेतूने राज्याचे ई-प्रशासन धोरण संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेले आहे. सदर शासन निर्णयामधील परिच्छेद १२.३ नुसार संबंधित प्रशासकीय विभागांनी प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ६ मध्ये प्रकल्प अंमलबजावणी समितीची रचना विहित केलेली आहे. त्यानुसार गृह विभागाच्या अखत्यारितील सर्व क्षेत्रीय कार्यालये, मंडळे इत्यादींचे संगणकीकरण आणि ई-प्रशासनाची अंमलबजावणी करण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दि.२३.९.२०११ व दि.२१.९.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना / निदेशानुसार गृह विभाग, उपविभाग, पोलीस महासंचालक कार्यालय, पोलीस आयुक्तालय तसेच त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयामध्ये संगणकीकरण व ई-प्रशासन प्रणाली राबविण्यासाठी खालील प्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) गठीत करण्यात येत आहे. विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्पांबाबत सदर समितीचा निर्णय अंतिम राहील. तसेच ई-गव्हर्नन्स प्रकल्पासाठी विभागाचे सह / उप सचिव (आस्थापना-२) यांना नोडल ऑफीसर म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ..क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव (गृह) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (नियोजन) किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | एन.आय.सी. चे प्रतिनिधी (आवश्यकतेनुसार) | सदस्य |
| ६ | माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील बाहेरचे तज्ञ (आवश्यकतेनुसार) | सदस्य |
| ७ | सह / उप सचिव (आस्था-२) | सदस्य सचिव तथा समन्वय अधिकारी |

अपर मुख्य सचिव (परिवहन व बंदरे), प्रधान सचिव (अ. व सु.), प्रधान सचिव (विशेष), प्रधान सचिव (राउशु) त्यांच्या उपविभागाशी संबंधित प्रकल्पांच्या अनुषंगाने प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीसाठी निमंत्रित सदस्य म्हणून उपस्थित राहतील. तसेच श्री. कौस्तूभ धावसे, विशेष कार्य अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय हे माहिती तंत्रज्ञान प्रकल्पाशी संबंधित बैठकीसाठी निमंत्रित सदस्य म्हणून उपस्थित राहतील.

उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या ई-गव्हर्नन्स धोरणाशी सुसंगत धोरण ठरविणे.
२) गृह विभाग आणि विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय कार्यालये व स्वायत्त संस्था यांचे कामकाज ऑनलाईन करण्यासंदर्भात अंतिम निर्णय घेणे. तसेच आवश्यकतेनुसार वेळोवेळी बैठका घेणे.
३) गृह विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व ई-गव्हर्नन्स प्रकल्पांची व्याप्ती ठरविणे व विभागासाठी ई-गव्हर्नन्स प्रकल्प सुरु करण्यासाठी RPF (Request for Proposal) अंतिम करून निविदा प्रक्रियेबाबत मार्गदर्शन करणे.
४) गृह विभागातील ई-गव्हर्नन्स प्रकल्पांच्या अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते हार्डवेअर/ सॉफ्टवेअर खरेदी करण्यासाठी निर्णय घेणे.
५) गृह विभागातील ई-गव्हर्नन्स प्रकल्पांचा आढावा घेणे. विभागामध्ये किंवा अधिनस्त कार्यालयासाठी राबविण्यात येणाऱ्या ई-गव्हर्नन्स प्रकल्पांसाठी आवश्यकतेनुसार नामिकाप्रविष्ट संस्थांमधून सल्लागाराची निवड करणे.

६) सामान्य प्रशासन विभागाने (माहिती तंत्रज्ञान) वेळोवेळी घेतलेल्या निर्णयानुसार तसेच प्रदान केलेल्या अधिकारानुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीस अधिकार राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०५२०१६४८३३५४२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Madhukar Lite

Digitally signed by Vijay Madhukar Lite
DN: CN = Vijay Madhukar Lite, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.05.25 16:22:07 +05'30'

**विजय लिटे**
कक्ष अधिकारी, गृह विभाग.

प्रत,

अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
अपर मुख्य सचिव (परि. व बंदरे) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
प्रधान सचिव (अ.व सु.), गृह विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
प्रधान सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गो.ते. रुग्णालय, मुंबई,
प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
सह सचिव (आस्था-२), गृह विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व संबंधित सह सचिव/उप सचिव, अवर सचिव/सर्व कक्ष अधिकारी,गृह विभाग,मंत्रालय, मुंबई,
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, राष्ट्रीय सूचना प्राद्योगिकी केंद्र, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती / वैयक्तिक नस्ती / आस्थापना-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.